**लक्ष्मी नारायण इन्स्टीट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, नागपूर संस्थेकरीता मुलींचे वसतिगृह इमारत बांधकामाकरीता प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. वसति-२०२३/प्र.क्र.४१/विशि-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २२ मे, २०२३.

वाचा :- १) संचालक, लक्ष्मी नारायण इन्स्टीट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, नागपूर यांचे दि.२९.०३.२०२३ रोजीचे पत्र.
२) वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.२०.०९.२०१९.
३) शासन परिपत्रक, क्रमांक : संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९.

**प्रस्तावना :-**

लक्ष्मी नारायण इन्स्टीट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, नागपूर या संस्थेची स्थापना नागपूर येथे १९४२ मध्ये झाली असून, सदर संस्था मध्य भारतातील रसायन तंत्रज्ञान या क्षेत्रात नावाजलेली संस्था असून, रसायन तंत्रज्ञान क्षेत्रात पदवी ते संशोधन या टप्प्यापर्यंत कार्य करते. सदर संस्थेकरीता मुलींचे वसतिगृह इमारत बांधकाम करण्याकरीता रु.१०००.०० लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास मान्यता देण्याची विद्यापीठाने संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये विनंती केली आहे. तद्नुषंगाने बांधकामाची किंमत रु.१५ कोटीच्या मर्यादित असल्याने संदर्भाधिन क्र.२ व ३ येथील शासन निर्णय व परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारानुसार लक्ष्मी नारायण इन्स्टीट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, नागपूर संस्थेकरीता मुलींचे वसतिगृह इमारत बांधकाम करण्याकरीता सादर केलेल्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

लक्ष्मी नारायण इन्स्टीट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, नागपूर संस्थेकरीता मुलींचे वसतिगृह इमारत बांधकाम करण्याकरीता रु.१०००.०० लक्ष (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१. विद्यापीठाच्या प्राधिकरणाची आवश्यक ती मान्यता घेण्यात यावी.
२. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.
३. प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घ्यावी.
४. तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूची बाह्य बाबीच्या दराकरिता शासन परिपत्रक क्रमांक.२०१७/प्र.क्र.११/ नियोजन-३, दि.११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.
५. प्रस्तावातील खरेदीशी संबंधीत बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करून उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.
६. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.
७. स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करून सदर कामे पूर्ण करावीत.
८. इमारतीमध्ये दिव्यांगाकरिता उपलब्ध करून द्यावयाच्या विविध सोयींबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

१. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही. या दृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. सदरहू बांधकामावर होणारा खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३ - विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (००) (०७) सर्वसाधारण शिक्षणासाठी विद्यापीठांना अनुदाने (अनिवार्य) (२२०२ ०७४५), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.२०.०९.२०१९ तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक-संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/ इमा-२, दि.२५ सप्टेंबर, २०१९ अन्वये प्रशासकीयविभागासदिलेल्याअधिकारानुसारनिर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५२३१२३३५६२३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2023.05.23 12:38:19 +05'30'

**( अजित बाविस्कर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
५) कुलगुरू, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ, नागपूर.
६) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
७) संचालक, लक्ष्मीनारायण तंत्रशास्त्र संस्था, नागपूर.
८) सह संचालक, उच्च शिक्षण, नागपूर.
९) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१०) महालेखापाल, (लेखा परीक्षण) - १/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
११) कुलसचिव, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ, नागपूर
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/ पुणे.
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई/ पुणे.
१४) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.